शासकीय वसतीगृहातील विद्यार्थ्यांना वस्तू स्वरूपात मिळणाऱ्या लाभाचे हस्तांतरण रोख स्वरूपात लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात थेट जमा करण्याबाबत (DBT).

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आवगृ- २०१७/प्र.क्र.१८/का-१२**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- ०६ मे, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.आवगृ-२०११/प्र.क्र.१७१/का-१२, दिनांक ११.११.२०११.
२) शासन शुद्धीपत्रक, आदिवासी विकास विभाग, क्र.आवगृ-२०११/प्र.क्र.१७१/का-१२, दिनांक १०.०४.२०१३ व दि.२९.०६.२०१३.
३) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.शाआशा-२०१५/प्र.क्र.३४१/का-१३, दिनांक १०.०३.२०१६.
४) शासन निर्णय, नियोजन विभाग, क्र.डिसीटी-२३१६ / प्र.क्र.१३३ / का-१४१७ दि.०५.१२.२०१६.

**प्रस्तावना :-**

आदिवासी विकास विभागाच्या अखत्यारितील शासकीय वसतीगृहातील विद्यार्थांना विविध सोयीसुविधा देणेबाबत तसेच विद्यार्थ्यांसाठी भोजन,बेडींग साहित्य, शैक्षणिक साहित्य व इतर वस्तूंचा पुरवठा करण्यासंदर्भात आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्र.१ ते ३ येथील शासन निर्णयान्वये नियमावली करण्यात आलेली आहे. आता शासनाद्वारे थेट लाभ हस्तांतरण प्रक्रियेवर मोठ्या प्रमाणावर भर देण्यात येत असुन त्यानुषंगाने नियोजन विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील दिनांक ०५.१२.२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये विविध कल्याणकारी योजनेंतर्गत वस्तू स्वरूपात देण्यात येणाऱ्या अनुदानाऐवजी त्याकरिता रोख स्वरुपात थेट निधी लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेतलेला आहे. तसेच महाराष्ट्र आधार (वित्तीय व इतर अर्थसहाय्य, लाभ व सेवा यांचे लक्ष्यित वितरण) अधिनियम २०१६, दिनांक २६ जानेवारी २०१७ पासून राज्यात लागू झालेला आहे. त्यानुसार शासनाकडून देण्यात येणारे कोणतेही अर्थसहाय्य, वित्तीय लाभ व सेवाच्या प्रयोजनार्थ संबंधित लाभार्थ्यांचे अधिप्रमाणन करून किंवा, पुरावा म्हणून आधार क्रमांक प्राप्त करुन त्या आधारे लाभार्थ्यांस थेट त्यांच्या आधारसंलग्नीत बँक खात्यात लाभाची रक्कम जमा करणे आवश्यक आहे.

उपरोक्त तरतुदीस अनुसरुन आदिवासी विकास विभागांतर्गत कार्यरत वसतीगृहातील विद्यार्थ्यांना त्यांच्या आवडीनुसार विविध साहित्य खरेदी करण्याची मूभा मिळावी, विद्यार्थ्यामध्ये

त्यासंदर्भात जागृती व्हावी व एकूणच खरेदी मध्ये पारदर्शकता राहण्याच्या दृष्टीने आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी शासकीय वसतीगृहांतील विद्यार्थ्यांना देय असलेल्या वस्तूंऐवजी थेट निधी विद्यार्थ्यांना वितरीत करण्याच्या प्रस्तावास अनुसरुन सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून शासकीय वसतीगृहातील विद्यार्थ्यांना वस्तू स्वरूपात मिळणाऱ्या लाभाचे हस्तांतरण रोख स्वरूपात (DBT) लाभार्थ्यांच्या आधार संलग्न बँक खात्यात जमा करण्याबाबतचे धोरण ठरविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

शासकीय आदिवासी वसतीगृहात विद्यार्थ्यांना देण्यात येणाऱ्या सोयी सुविधांबाबतच्या संदर्भाधिन १ येथील दिनांक ११.११.२०११ रोजीचा शासन निर्णय व त्यानुषंगिक शासन शुद्धीपत्रकामधील “परिशिष्ट - अ” मध्ये नमूद विविध वैयक्तिक लाभाकरिता निश्चित केलेली रक्कम यापुढे सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून विद्यार्थ्यांच्या **आधार क्रमांक संलग्नीत बँक खात्यामध्ये** जमा करण्यात यावी.

२. शासकीय आदिवासी वसतीगृहांतील विद्यार्थ्यांना **सन २०१७-१८ या शैक्षणिक वर्षापासून** खालील वस्तूचा शासनामार्फत खरेदी करून पुरवठा करण्यात येऊ नये, अशा लाभाचे वस्तु स्वरुपात अनुदान देण्याऐवजी त्याकरिता विद्यार्थ्यांच्या आधार क्रमांक संलग्नीत बँक खात्यामध्ये रोख रक्कम थेट जमा करण्यात यावी.

| रोख स्वरुपात थेट लाभ द्यावयाच्या वस्तू | लाभ हस्तांतरण पध्दत |
|---|---|
| १) सतरंजी<br>२) चादर<br>३) बेडशीट<br>४) उशी व उशी कव्हर<br>५) ब्लँकेट<br>६) वहया व अभ्यासक्रमासाठी आवश्यक इतर शैक्षणिक साहित्य<br>७) क्रमिक पुस्तके /संदर्भ पुस्तके<br>८) छत्री | सदरच्या वस्तू सोबत जोडलेल्या परिशिष्टा मध्ये नमुद परिमाण (specification), संख्या व तपशीलानुसार विद्यार्थ्याने स्वत: खरेदी करून उपलब्ध करून घेण्यास्तव, वसतीगृहात प्रवेशीत विद्यार्थी शिक्षण घेत असलेल्या अभ्यासक्रमाच्या प्रकारानुसार **परिशिष्ट II ते V मध्ये नमूद केल्याप्रमाणे प्रत्येक विद्यार्थ्यास प्रती वर्षाकरिता** एकत्रित देय रक्कम **त्याच्या आधार क्रमांक संलग्नीत बँक खात्यात थेट जमा** करण्यात यावी. |

**३. उपरोक्त वस्तुऐवजी विद्यार्थ्यांस रोख स्वरुपात थेट लाभ देतांना अनुसरावयाची कार्यपद्धती-**

**३.१** शासकीय आदिवासी मुला-मुलींच्या वसतीगृहामध्ये प्रवेशीत विद्यार्थ्यांनी शिक्षण घेत असलेल्या अभ्यासक्रमाच्या प्रकारानुसार प्रत्येक शैक्षणिक वर्षासाठी उपलब्ध करुन घ्यावयाचे

बेडींग साहित्य,वहया व इतर आवश्यक शैक्षणिक साहित्य, क्रमीक / संदर्भ पुस्तके ,छत्री आणि त्याकरिता रोख स्वरूपात द्यावयाची एकत्रित रक्कम याची माहिती सोबत जोडलेल्या परिशिष्टांमध्ये दिलेली आहे. त्यानुसार आवश्यक सुविधा उपलब्ध करुन घेण्यासाठी देय रक्कम विद्यार्थ्याच्या आधार क्रमांक संलग्नीत बँक खात्यात जमा करण्यात यावी.

३.२ वसतीगृह प्रवेश अर्ज दाखल करताना विद्यार्थ्यांना अभ्यासक्रमनिहाय कोणत्या वस्तूंसाठी रोख स्वरुपात थेट रक्कम मिळणार आहे व त्या वस्तूंचे परिमाण व संख्या इ तपशीलाची यादी संबंधित गृहप्रमुख / गृहपाल यांनी विद्यार्थी / पालकांना उपलब्ध करुन द्यावी. तसेच वसतीगृहात प्रवेशित सर्व विद्यार्थ्यांचे बँक खाते उघडून त्यास आधार क्रमांक संलग्न करण्यात यावा. अशा आधार क्रमांक संलग्नीत बँक खात्यामध्येच उपरोक्त निश्चित देय रक्कम थेट जमा करण्यात यावी. सदर जमा करण्यात आलेल्या रोख रकमेमधून विद्यार्थ्यांनी विहित परिमाण व तपशीलाप्रमाणे वस्तुची खरेदी केल्याबाबतची खातरजमा संबधित वसतीगृहाचे गृहप्रमुख/गृहपाल यांचे मार्फत करण्यात यावी आणि संबंधित विद्यार्थ्याने सर्व साहित्य खरेदी केल्याबाबतची नोंद गृहप्रमुख/गृहपाल यांच्याकडे करावी.

३.३ वसतीगृहात विद्यार्थ्याचा प्रवेश निश्चित होऊन विद्यार्थी उपस्थित झाल्यानंतर सात दिवसांच्या आत पहिला हप्त्यामध्ये विद्यार्थ्याच्या अभ्यासक्रमानुसार एकत्रित देय रकमेच्या ६० टक्के रक्कम त्याच्या आधार क्रमांक संलग्नीत बँक खात्यात थेट जमा करण्यात यावी. विद्यार्थ्याने सर्व वस्तु खरेदी केल्याची खात्री केल्यानंतर एकत्रित देय रकमेच्या उर्वरित ४० टक्के रक्कम दुसऱ्या हप्त्यात जमा करण्यात यावी.

४. उपरोक्त प्रमाणे आधार क्रमांक संलग्नित बँक खात्यावर लाभ देण्याबाबतची कार्यवाही करताना विद्यार्थ्यांचा आधार क्रमांक, बँक खाते क्रमांक व त्याच्याशी संबंधित कोणतीही वैयक्तीक स्वरूपाची माहिती जाहीरपणे प्रकाशित करू नये, किंवा अशी माहिती ऑनलाईन प्रणालीव्दारे सहजरित्या उपलब्ध होणार नाही याची खबरदारी घेण्यात यावी. लाभार्थ्यांना लाभ देण्यापुरताच अशा माहितीचा वापर करण्यात यावा, आणि याविषयी केंद्रीय आधार कायदा, २०१६ तसेच माहिती तंत्रज्ञान कायदा, २००० व त्याखालील नियम २०११ मधील तरतुदीचे पालन करून कार्यवाही करण्यात यावी.

५. उपरोक्तप्रमाणे विहीत वेळेत कार्यवाही करून केलेल्या कार्यवाहीचा अहवाल सर्व प्रकल्प अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांच्यामार्फत शासनास सादर करावा.

६. सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०५०८१२१७१८१७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Subrao Narayan Shinde

Digitally signed by Subrao Narayan Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ffa7b5a27faed7560194e6272933cfa60dca1eb8ab54859eae7920c9d0d1f622, cn=Subrao Narayan Shinde
Date: 2017.05.08 12:20:14 +05'30'

**( सु.ना.शिंदे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री ( आदिवासी विकास ), मंत्रालय, मुंबई
४) मा. राज्यमंत्री ( आदिवासी विकास ), मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
६) मा. सचिव, आदिवासी विकास, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७) मा. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई.
८) निबंधक, उच्च न्यायालय, मुंबई, / खंडपीठ नागपूर / खंडपीठ औरंगाबाद.
९) आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
१०) आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
११) अपर आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य नागपूर / नाशिक/ ठाणे / अमरावती.
१२) सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
१३) महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
१४) महालेखापाल (लेखा परिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
१५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
१६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१७) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई.
१८) सर्व उप सचिव/ अवर सचिव/कार्यासन अधिकारी, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९) उप सचिव (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
२०) सर्व गृहप्रमुख / गृहपाल, शासकीय आदिवासी वसतीगृह
२१) निवडनस्ती (का-१२) आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

**(शासन निर्णय क्रमांक आवगृ- २०१७/प्र.क्र.१८/का-१२, दिनांक :- ०६ मे, २०१७ सोबतचे परिशिष्ट)**

**( परिशिष्ट- I )**

शासकीय वसतीगृहांतील विद्यार्थ्यांना थेट लाभ हस्तांतरण अतंर्गत **बेडींग साहित्य** उपलब्ध करून घेण्यासाठी आवश्यक परिमाण व संख्या (specification and quantity)

| अ क्र | वस्तु / बाब | परिमाण | संख्या |
|---|---|---|---|
| १ | सतरंजी/दरी | ६ x ४ फुट | १ |
| २ | चादर | ५४ x ९० इंच | १ |
| ३ | वुलन ब्लकेट | ५४ x ९० इंच | १ |
| ४ | बेडशीट | ५४ x ९० इंच | २ |
| ५ | उशी | १२ x १४ इंच | १ |

**(शासन निर्णय क्रमांक आवगृ- २०१७/प्र.क्र.१८/का-१२, दिनांक :- ०६ मे, २०१७ सोबतचे परिशिष्ट)**

**( परिशिष्ट -II )**

शासकीय वसतीगृहात प्रवेशित **इयत्ता ८ वी ते १०वी** मध्ये शिक्षण घेत असलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याला प्रती वर्षाकरिता खालील नमूद बाबीसाठी रोख स्वरुपात अनुज्ञेय रक्कम.

| अ.क्र. | तपशिल | सर्व वस्तूंसाठी एकूण देय रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | बेडींग साहित्य (परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे) | ३२०० |
| २ | वहया; स्टेशनरी (कंपास, फुटपट्टी, पेन्सील, पेन, रंगपेटी इ.); प्रयोगवही/कार्यानुभव/नकाशा वही/आलेख वही/चित्रकला वही व शालेय अभ्यासक्रमासाठी आवश्यक इतर शालेय साहित्य. | |
| ३ | इयत्ता ९ वी व १० वी च्या विद्यार्थ्याना क्रमीक पुस्तके | |
| ४ | छत्री | |

**(शासन निर्णय क्रमांक आवगृ- २०१७/प्र.क्र.१८/का-१२, दिनांक :- ०६ मे, २०१७ सोबतचे परिशिष्ट)**

( परिशिष्ट- III )

शासकीय वसतीगृहात प्रवेशित **इयत्ता ११ वी, १२ वी** (कला,विज्ञान व वाणिज्य ) ; **इयत्ता १० वी तसेच इयत्ता १२ वीच्या शैक्षणिक पात्रतेवर आधारित** २ व ३ वर्ष कालावधीचे **पदविका** अभ्यासक्रमामध्ये शिक्षण घेत असलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याला प्रती वर्षाकरिता खालील नमूद बाबीसाठी रोख स्वरुपात अनुज्ञेय रक्कम.

| अ.क्र. | तपशिल | सर्व वस्तूंसाठी एकूण देय रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | बेडींग साहित्य (परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे) | ४००० |
| २ | वहया; जर्नल/प्रयोगवही/कार्यानुभव अशा नोंदवह्या; अभ्यासक्रमासाठी आवश्यक इतर शैक्षणिक साहित्य. | |
| ३ | क्रमीक पुस्तके / संदर्भ पुस्तके | |
| ४ | छत्री | |

**(शासन निर्णय क्रमांक आवगृ- २०१७/प्र.क्र.१८/का-१२, दिनांक :- ०६ मे, २०१७ सोबतचे परिशिष्ट)**

**(परिशिष्ट -IV)**

शासकीय वसतीगृहात प्रवेशित इयत्ता **१२ वी च्या शैक्षणिक पात्रतेवर आधारित पदवी अभ्यासक्रम (जसे कला/वाणिज्य/विज्ञान/कायदा/कृषि इ.)** तसेच अशा अभ्यासक्रमाशी **संबंधित पदव्युत्तर पदवी किंवा पदविका** अभ्यासक्रमात शिक्षण घेत असलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याला प्रती वर्षाकरिता खालील नमूद बाबीसाठी रोख स्वरुपात अनुज्ञेय रक्कम.

| अ.क्र. | तपशिल | सर्व वस्तूंसाठी एकूण देय रक्कम (रुपये) |
|---|---|---|
| १ | बेडींग साहित्य (परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे) | ४५०० |
| २ | वहया व अभ्यासक्रमासाठी आवश्यक इतर शैक्षणिक साहित्य | |
| ३ | क्रमीक पुस्तके / संदर्भ पुस्तके | |
| ४ | छत्री | |

**(शासन निर्णय क्रमांक आवगृ- २०१७/प्र.क्र.१८/का-१२, दिनांक :- ०६ मे, २०१७ सोबतचे परिशिष्ट)**

**(परिशिष्ट-V)**

शासकीय वसतीगृहात प्रवेशित **वैद्यकीय व अभियांत्रिकी** अभ्यासक्रमाचे पदवी व पदव्युत्तर शिक्षण घेत असलेल्या प्रत्येक विद्यार्थ्याला प्रती वर्षाकरिता खालील नमूद बाबीसाठी रोख स्वरुपात अनुज्ञेय रक्कम.

| **अ.क्र.** | **तपशिल** | **सर्व वस्तूंसाठी एकूण देय रक्कम (रुपये)** |
|---|---|---|
| १ | बेडींग साहित्य (परिशिष्ट-१ मध्ये नमूद केल्याप्रमाणे) | ६००० |
| २ | वहया व अभ्यासक्रमासाठी आवश्यक इतर शैक्षणिक साहित्य | |
| ३ | क्रमीक पुस्तके / संदर्भ पुस्तके | |
| ४ | छत्री | |